**पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणी पट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणे.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांक:-देवदु २०१५/( ८३६ /२०१५)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ:-** शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २००४/(२०२/२००४)/ जसंनि, दि.२८.०६.२००४.

**पार्श्वभूमी :-**

राज्यातील विदर्भ, तापी, गोदावरी, कोकण व कृष्णा या पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमामध्ये त्यांच्या कार्यक्षेत्रातील नवीन प्रकल्पांची बांधकामे आणि पूर्ण झालेल्या प्रकल्पांचे सिंचनव्यस्थापन करण्याची तरतुद आहे (कलम १८ व १९). त्यानुसार दि. २७.२.२००४ पर्यंत प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाचे काम संबंधीत महामंडळामार्फत केले जात होते. सन २००४ मध्ये राज्यात राबविलेल्या महाराष्ट्र जलक्षेत्रसुधार प्रकल्पांसाठी जागतिक बँकेचे अर्थसहाय्य घेण्यासाठी सिंचन व्यस्थापनाचे काम व संबंधीत कार्यालये शासनाकडे संदर्भ आदेशानुसार वर्ग करण्यात आली होती. आता सदरचा प्रकल्प सन २०१४ मध्ये पूर्ण झालेला आहे. राज्यात सन २००५ मध्ये सिंचन व्यवस्थापनाकरिता महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ व महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-याकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू केले असून त्यामधील तरतुदीनूसार महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाची जबाबदारी नदीखोरे प्राधिकरण म्हणून महामंडळावर आहे. या पार्श्वभूमीवर सिंचन व्यवस्थापनाचे काम व संबंधीत कार्यालये महामंडळांच्या अधिनियमातील तरतुदीनुसार वर्ग करणे आणि महामंडळातंर्गत सिंचन प्रकल्पातून मिळणाऱ्या पाणीपट्टीची रक्कम सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास पाटबंधारे विकास महामंडळाना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या विषयाचा निर्णय मा. मंत्रिमंडळाने दि.०८ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीत खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१.० महामंडळांच्या कार्यक्षेत्रातील पूर्ण झालेल्या सिंचन प्रकल्पांचे सिंचन व्यवस्थापन, परिरक्षण व देखभाल दुरुस्तीचे काम आणि सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर्शविलेली सिंचन व्यवस्थापनाची सर्व कार्यालये महामंडळाच्या अधिनियमातील कलम १८ व १९ मधील तरतूदीनुसार शासनाकडून संबंधित महामंडळाकडे वर्ग करण्यात येत आहेत.

२.० यापुढे सिंचन प्रकल्पातून मिळणारी सिंचन व बिगर सिंचन पाणीपट्टीची रक्कम संबधित महामंडळाकडे जमा करावी. महामंडळ स्तरावर जमा झालेल्या सिंचन व बिगरसिंचन पाणीपट्टीच्या रकमेपैकी, सिंचन पाणीपट्टीची रक्कम ज्या प्रकल्पातून वसूल झाली त्याच प्रकल्पावर खर्च करण्यात यावी. बिगर सिंचन पाणीपट्टीच्या एकूण रक्कमेपैकी ६० टक्के रक्कम राज्यस्तरीय सिंचन कोषामध्ये जमा करावी आणि बिगरसिंचन पाणीपट्टीची ४० टक्के रक्कम सिंचन प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनासाठी महामंडळ स्तरावर खर्च करावी.

**३.०** राज्यस्तरीय सिंचन कोषामध्ये सर्व महामंडळाकडून जमा होणा-या रकमेचे वितरण सर्व पाटबंधारे महामंडळांना त्यांच्या अंतर्गत निर्मित झालेल्या सिंचन क्षमतेच्या प्रमाणात करण्यात येईल. त्यासाठीची प्रणाली व महामंडळांतर्गत निर्मित सिंचन क्षेत्राचा तपशील स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

**४.०** वरील परिच्छेद क्र. २ व ३ नुसार महामंडळस्तरावर उपलब्ध होणाऱ्या पाणीपट्टीच्या रकमेतून महामंडळाच्या कार्यक्षेत्रातील सिंचन प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाचा सर्व खर्च म्हणजे देखभाल दुरुस्ती, शासकीय उपसा योजनांची दुरूस्ती व विज देयके, व्यवस्थापनाचा कार्यालयीन खर्च, आस्थापना आणि पाणी वापर संस्थांचे परतावे इ. भागवावा. प्रकल्पांच्या दुरुस्तीच्या कामांना व सिंचन पुनर्स्थापनेच्या कामांना महामंडळ स्तरावरुन मान्यता देण्यात यावी. महामंडळाकडे देखभाल दुरुस्तीसाठी वरील प्रमाणे उपलब्ध होणाऱ्या निधीच्या मर्यादेत न बसणारी विशेष दुरूस्तीची कामे (विस्तार व सुधारणा) प्रचलित पध्दतीनुसार महामंडळांना उपलब्ध होणा-या योजनांतर्गत निधीमधून करण्यात यावीत.

**५.०** सिंचन प्रकल्पातील पाणी बिगर सिंचनासाठी आरक्षित केल्यामुळे कपात होणाऱ्या सिंचन क्षेत्राच्या पुनर्स्थापनासाठी घेतली जाणारी सिंचन पुनर्स्थापना रक्कम महामंडळ स्तरावर जमा करावी व ती त्याच प्रकल्पाच्या सिंचनक्षेत्राच्या पुनर्स्थापनेच्या कामासाठी खर्च करावी.

**६.०** प्रतिवर्षी महामंडळास सिंचन व्यवस्थापनासाठी पाणीपट्टीच्या रकमेतून उपलब्ध होणारा निधी प्रकल्पांच्या देखभाल दुरुस्तीचा खर्च, आस्थापना खर्च व इतर खर्चाचा नियोजनाचा आराखडा व ताळेबंद एप्रिल महिन्यात महामंडळ स्तरावर मंजूर करावा व १५ ऑक्टोबरचा पाणीसाठा विचारात घेऊन अंतिम करावा.

**७.०** महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम कलम ११ (घ) नुसार सिंचन व्यवस्थापनाचा खर्च पाणीपट्टीच्या रकमेतून भागविणे आवश्यक असल्याने यापुढे पाटबंधारे विकास महामंडळांना सिंचन प्रकल्पांच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी शासनाकडून अर्थसंकल्पातून योजनेत्तर अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

८.० पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत सिंचन व्यवस्थापन आस्थापना खर्चासाठी आवश्यक अनुदान प्रचलित पध्दतीने शासन स्तरावरुन देण्यात येईल. त्याचा परतावा महामंडळांनी त्यांना पाणीपट्टीमधून परिच्छेद क्र. २ व ३ मधील सुत्रानुसार उपलब्ध होणा-या निधीतून सन २०१६ - १७ मध्ये २०%, सन २०१७ - १८ मध्ये ४०% व सन २०१८ - १९ मध्ये ६०%, सन २०१९-२० मध्ये ८०% व सन २०२०-२१ पासून पुढे १००% अशा टप्प्याने शासनास अदा करावा.

९.० पाटबंधारे विकास महामंडळाना सर्व प्रकल्पांवर पाणी वापर संस्थेद्वारे सिंचन व्यवस्थापन करणे बंधनकारक राहील.

**१०.०** सदर आदेशाची अंमलबजावणी शासन आदेशाच्या दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११७१७२४५७२६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S M Upase
Digitally signed by S M Upase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary (CAD), postalCode=400032, st=Maharashtra, cn=S M Upase
Date: 2016.11.18 11:41:24 +05'30'

( शि.मा.उपासे )
सचिव (जसंव्य व लाक्षेवि)

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
९.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०.महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
११. प्रधान सचिव वित्त विभाग / नियोजन विभाग / ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१२.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जसंप्र व वि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.स्वीय सहायक, सचिव (जसंव्य व लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
१५.मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.सर्व मुख्य अभियंते, जलसंपदा विभाग
१७.उप सचिव (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८.सर्व अधीक्षक अभियंते, जलसंपदा विभाग
१९.सर्व कार्यकारी अभियंते, जलसंपदा विभाग
२०.सर्व तांत्रिक कार्यासन, जलसंपदा विभाग
२१.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२.सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक:- देवदु २०१५/( ८३६ /२०१५)/सिं.व्य.(कामे),

दि.१७ नोव्हेंबर,२०१६ चे सहपत्र.

प्रपत्र "अ"

महामंडळाकडे वर्ग करावयाच्या कार्यालयांची यादी.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | अ.क्र. | कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड. | १५ | कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र.२, परभणी. |
| २ | कार्यकारी अभियंता, उर्ध्व पैनगंगा प्रकल्प विभाग क्र.१ नांदेड. | १६ | कार्यकारी अभियंता, नांदूर मध्यमेश्वर पाटबंधारे विभाग, वैजापूर. |
| ३ | कार्यकारी अभियंता, पूर्णा पाटबंधारे विभाग, बसमत. | १७ | कार्यकारी अभियंता, जालना पाटबंधारे विभाग , जालना. |
| ४ | कार्यकारी अभियंता, नांदेड पाटबंधारे विभाग (दक्षिण), नांदेड. | १८ | कार्यकारी अभियंता,जायकवाडी पाटबंधारे विभाग, पैठण. |
| ५ | कार्यकारी अभियंता, नांदेड पाटबंधारे विभाग (उत्तर), नांदेड. | १९ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक |
| ६ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, बीड, | २० | कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक. |
| ७ | कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग क्र.२, लातूर. | २१ | कार्यकारी अभियंता, पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक. |
| ८ | कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग क्र.१, लातूर. | २२ | कार्यकारी अभियंता, मालेगाव पाटबंधारे विभाग, मालेगाव. |
| ९ | कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र.३, बीड. | २३ | कार्यकारी अभियंता, अहमदनगर पाटबंधारे विभाग, अहमदनगर |
| १० | कार्यकारी अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे विभाग क्र.१, उस्मानाबाद. | २४ | कार्यकारी अभियंता, मूळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर |
| ११ | कार्यकारी अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे विभाग क्र.२, उमरगा, | २५ | अधीक्षक अभियंता,सातारा सिंचन मंडळ, सातारा. |
| १२ | कार्यकारी अभियंता, माजलगाव पाटबंधारे विभाग, परळी. | २६ | कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर |
| १३ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद | २७ | कार्यकारी अभियंता, धोम पाटबंधारे विभाग, सातारा. |
| १४ | कार्यकारी अभियंता, औरंगाबाद पाटबंधारे विभाग, औरंगाबाद. | | |

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | अ.क्र. | कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|
| २८ | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर | ४४ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, सोलापूर. |
| २९ | कार्यकारी अभियंता,कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर. | ४५ | कार्यकारी अभियंता, उजनी धरण व्यवस्थापन विभाग, भिमानगर |
| ३० | कार्यकारी अभियंता,कोल्हापूर पाटबंधारे विभाग (उत्तर), कोल्हापूर. | ४६ | कार्यकारी अभियंता, भिमा विकास विभाग क्र.२, सोलापूर. |
| ३१ | अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली मिरज कुपवाड. | ४७ | कार्यकारी अभियंता, भिमा पाटबंधारे विभाग, पंढरपूर. |
| 32 | कार्यकारी अभियंता, ताकारी-म्हैसाळ उपसा सिंचन व्यवस्थापन विभाग, सांगली | ४८ | कार्यकारी अभियंता, सोलापूर पाटबंधारे विभाग, सोलापूर. |
| ३३ | कार्यकारी अभियंता, सांगली पाटबंधारे विभाग, सांगली मिरज कुपवाड. | ४९ | अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, कुवारबाव, रत्नागिरी. |
| ३४ | कार्यकारी अभियंता, टेंभु उपसा सिंचन प्रकल्प व्यवस्थापन विभाग, ओगलेवाडी (हजारमाची) | ५० | कार्यकारी अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे विभाग, कुवारबाव. |
| ३५ | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे | ५१ | कार्यकारी अभियंता, सिंधुदुर्ग पाटबंधारे विभाग, आंबडपाल. |
| ३६ | कार्यकारी अभियंता, चासकमान पाटबंधारे विभाग, पुणे. | ५२ | अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे |
| ३७ | कार्यकारी अभियंता, नीरा उजवा कालवा विभाग, फलटण. | ५३ | कार्यकारी अभियंता, ठाणे पाटबंधारे विभाग, ठाणे. |
| ३८ | कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे , पुणे. | ५४ | कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड. |
| ३९ | कार्यकारी अभियंता, उपसा सिंचन व्यवस्थापन मंडळ, पुणे. | ५५ | कार्यकारी अभियंता, पालघर पाटबंधारे विभाग, मनोर, जि. पालघर. |
| ४० | कार्यकारी अभियंता, खडकवासला पाटबंधारे विभाग, पुणे. | ५६ | कार्यकारी अभियंता, भातसा व्यवस्थापन विभाग, भातसानगर. |
| ४१ | अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ, पुणे | ५७ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव |
| ४२ | कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्र.१, नारायणगाव. | ५८ | कार्यकारी अभियंता, गिरणा पाटबंधारे विभाग, जळगाव. |
| ४३ | कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्र.२, श्रीगोंदा. | ५९ | कार्यकारी अभियंता, जळगाव पाटबंधारे विभाग, जळगाव. |
| | | ६० | कार्यकारी अभियंता,धुळे पाटबंधारे विभाग, धुळे. |

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | अ.क्र. | कार्यालयाचे नाव |
|---|---|---|---|
| ६१ | अधीक्षक अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ, चंद्रपूर, | ७३ | कार्यकारी अभियंता, बेंबळा पाटबंधारे विभाग, यवतमाळ. |
| ६२ | कार्यकारी अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे विभाग, चंद्रपूर. | ७४ | कार्यकारी अभियंता, अरूणावती पाटबंधारे विभाग, दिग्रस. |
| ६३ | कार्यकारी अभियंता, वर्धा पाटबंधारे विभाग, वर्धा. | ७५ | कार्यकारी अभियंता, यवतमाळ पाटबंधारे विभाग, यवतमाळ. |
| ६४ | अधीक्षक अभियंता, भंडारा पाटबंधारे मंडळ, भंडारा. | ७६ | अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा पाटबंधारे मंडळ, अमरावती. |
| ६५ | कार्यकारी अभियंता, भंडारा पाटबंधारे विभाग, भंडारा. | ७७ | कार्यकारी अभियंता, उर्ध्व वर्धा पाटबंधारे विभाग, अमरावती. |
| ६६ | कार्यकारी अभियंता, गोंदिया पाटबंधारे विभाग, गोंदिया. | ७८ | कार्यकारी अभियंता, मध्यम व लघु पाटबंधारे विभाग, अचलपूर. |
| ६७ | कार्यकारी अभियंता, बाघ इटियाडोह पाटबंधारे विभाग, गोंदिया. | ७९ | अधीक्षक अभियंता, वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम. |
| ६८ | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर | ८० | कार्यकारी अभियंता, वाशिम पाटबंधारे विभाग, वाशिम. |
| ६९ | कार्यकारी अभियंता, नागपूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), नागपूर. | ८१ | अधीक्षक अभियंता, अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला. |
| ७० | कार्यकारी अभियंता, नागपूर पाटबंधारे विभाग (उत्तर), नागपूर. | ८२ | कार्यकारी अभियंता, अकोला पाटबंधारे विभाग, अकोला. |
| ७१ | कार्यकारी अभियंता, पेंच पाटबंधारे विभाग, नागपूर. | ८३ | कार्यकारी अभियंता, बुलडाणा पाटबंधारे विभाग, बुलडाणा. |
| ७२ | अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ | | |

टिप:- १) वरील तक्त्यातील सिंचन व्यवस्थापनाशी संबधित विभाग हे त्यांच्या अधिनस्त सर्व सिंचन व्यवस्थापन उपविभाग व शाखा कार्यालयांसह वर्ग करण्यात येत आहेत.

२) तसेच वरील यादीत नसलेल्या बांधकाम विभागाकडील सिंचन व्यवस्थापनाची सर्व उपविभाग व शाखा कार्यालये महामंडळाकडे वर्ग करण्यात येत आहेत.

S M Upase

Digitally signed by S M Upase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary (CAD), postalCode=400032, st=Maharashtra, cn=S M Upase
Date: 2016.11.18 11:41:41 +05'30'

(शि.मा.उपासे)

सचिव (जसंव्य व लाक्षेवि)